**राज्यातील ग्रामीण भागातील सांडपाणी व्यवस्थापन प्रकल्प राबविण्यासाठी सन २०२१-२२ करिता निधी वितरीत करणेबाबत...**
**(लेखाशीर्ष २२१५ ९८७१)**

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः नाबार्ड-२०२१/प्र.क्र.१९६/पापु-१६**
७ वा मजला, जी.टी. रूग्णालय संकुल,
लोकमान्य टिळक रोड, मंत्रालय, मुंबई- ४०० ००१.
दिनांक: २५ मार्च, २०२२

**वाचा-**

१. शासन निर्णय क्रमांक पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग: नाबार्ड-२०१४/प्र.क्र.०४/पापु-०८, दिनांक १४ ऑगस्ट, २०१४.
२. शासन निर्णय क्रमांक वित्त विभाग: नाबार्ड-२०१३/प्र.क्र.५६/अर्थबळ, दिनांक २९ डिसेंबर,२०१५.
३. शासन निर्णय क्रमांक वित्त विभाग : अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ ३, दिनांक १४ ऑक्टोबर २०२१.
४. शासन निर्णय क्रमांक वित्त विभाग : अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ ३, दिनांक ०३ फेब्रुवारी, २०२२.

**प्रस्तावना-**

राज्याच्या ग्रामीण भागातील सांडपाणी व्यवस्थापनाकरिता, नाबार्ड, ग्रामीण पायाभूत विकास निधी-१९ (RIDF-XIX) कर्ज अंतर्गत राज्यातील ग्रामीण भागातील १५,००० व त्यापेक्षा अधिक लोकसंख्या असलेल्या २८ गावांतील सांडपाणी व्यवस्थापन प्रकल्प राबविण्यासाठी रु.११२५८.३८ लक्ष रक्कमेच्या प्रकल्पास वाचा क्र.१ येथील पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाच्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली आहे. तसेच वाचा क्र.२ येथील वित्त विभागाच्या शासन निर्णयान्वये सदर प्रकल्प पूर्ण करण्याकरीता नाबार्डने मंजूर केलेल्या योजनेसाठी रू.९७३५.०१ लक्ष रकमेचे कर्ज स्विकारार्ह ठरविले आहे. राज्याच्या ग्रामीण भागातील सांडपाणी व्यवस्थापनाकरिता, सन २०२१-२२ च्या अर्थसंकल्पिय अंदाजानुसार लेखाशीर्ष २२१५ ९८७१ खाली रु.१९००.०० लक्ष इतका निधी अर्थसंकल्पीत करण्यात आला होता. सन २०२१-२२ च्या सुधारित अंदाजानुसार रू.१०२५.०० लक्ष इतकी तरतूद अर्थसंकल्पित करण्यात आलेली आहे. त्यापैकी रु.९५०.०० लक्ष (रु.नऊ कोटी पन्नास लक्ष फक्त) इतका निधी वित्त विभागाने बीम्स प्रणालीवर

वितरणासाठी उपलब्ध करुन दिला आहे. सदर रु.९५०.०० लक्ष (रु.नऊ कोटी पन्नास लक्ष फक्त) इतका निधी वितरीत करण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

## शासन निर्णय-

वित्त विभागाने अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीवर राज्याच्या ग्रामीण भागातील वाचा क्र.१ येथील पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाच्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आलेल्या गावांत सांडपाणी प्रकल्प राबविण्यासाठी सन २०२१-२२ या वर्षाकरिता (लेखाशीर्ष २२१५ ९८७१ अंतर्गत) रु.९५०.०० लक्ष (रु.नऊ कोटी पन्नास लक्ष फक्त) इतका निधी उपलब्ध करून दिलेला आहे. सदर रु.९५०.०० लक्ष इतका निधी सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण मुंबई यांना खालील अटींच्या अधीन राहून मुक्त करण्यात येत आहे.

३. या शासन निर्णयाद्वारे मुक्त केलेली रक्कम खालील अटींची पूर्तता करण्याच्या अधीन मंजूर करण्यात येत आहे.

i) या शासन निर्णयान्वये वितरीत केलेला निधी विचारात घेता, ज्या प्रकल्पांचे काम अपूर्ण आहे, अशा अपूर्ण प्रकल्पांना आवश्यक निधी उपलब्ध वा वितरीत केल्यानंतर सदरचे प्रकल्पा विना अडथळे पूर्ण करता येतील, अशी सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांची खात्री झाल्यानंतरच, अशा प्रकल्पांना प्राथम्यक्रमाने, आवश्यक निधी वितरीत करण्याच्या अनुषंगाने निधी वाटपाचे नियोजन करण्यात यावे.

ii) मोहोळ, सोलापूर या प्रकल्पाच्या कामाच्या अनुषंगाने जमीन अधिग्रहणाची कार्यवाही पूर्ण झाल्याबाबत कागदपत्र प्राप्त करून घेवून, खात्री केल्यानंतरच, या प्रकल्पास कामास निधी वितरण करण्यात यावे.

iii) या शासन निर्णयान्वये मंजूर केलेले अनुदान ज्या कारणासाठी मंजूर करण्यात आले आहे, त्याच कारणासाठी वाचा क्रमांक १ येथील पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाच्या शासन निर्णयान्वये प्रदान केलेल्या प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेत खर्च करण्यात यावे. संबंधित अंमलबजावणी यंत्रणांनी या

शासन निर्णयान्वये मुक्त केलेला निधी, या कार्यक्रमासाठी उघडलेल्या स्वतंत्र बँक खात्यात जमा करावा. संबंधित अंमलबजावणी यंत्रणांनी या अनुदानातून केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे ठेवावेत.

iv) सदर प्रकल्पातील समाविष्ट गावांसाठी आवश्यक ते सर्व तपशिलवार प्रकल्प अहवाल व आराखडे तयार करुन, त्यांची यथायोग्य मंजूरी घेवून, अंमलबजावणी संदर्भात शासनाच्या प्रचलित नियमांनुसार आवश्यक ती कार्यवाही करण्याची दक्षता सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण मुंबई यांनी घ्यावी.

v) क्षेत्रीय स्तरावरील तसेच कार्यक्रमाच्या अंमलबजावणीसंबधी सर्व जबाबदारी सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई यांची राहील.

vi) सदर उपलब्ध निधी हा केवळ प्रशासकीय मान्यता प्रदान केलेल्या गावांत सांडपाणी व्यवस्थापन प्रकल्प करण्यासाठी पूर्ण तसेच मंजूर असलेल्या तंत्रज्ञानाद्वारे राबविण्याकरिता वितरीत करता येईल.

vii) सदर योजनेतील पूर्ण झालेल्या सांडपाणी व्यवस्थापन प्रकल्पांची राज्यस्तरावरून तपासणी करण्यात आल्यानंतर, देखभाल व दुरूस्ती आणि तद्नुषंगिक देयक अदा करण्यासाठी निधी वितरीत करण्यात यावा.

viii) सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधीकरण यांनी शासनास कळविल्याप्रमाणे, ज्या प्रकल्पांचे काम पूर्ण करावयाचे आहे, त्याबाबत प्रत्येक महिन्याला भौतिक व आर्थिक आढावा घेवून, त्याबाबतचा प्रकल्पनिहाय प्रगती अहवाल शासनास सादर करण्याची जबाबदारी सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण मुंबई यांची राहील.

ix) वाचा मधील क्र. ३ व ४ येथील वित्त विभागाकडील शासन निर्णयात नमूद केलेल्या अटींचे पालन करण्याबाबतची दक्षता सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण मुंबई यांनी घ्यावी.

x) निधी खर्च झाल्यानंतर, खर्चाच्या उपयोगिता प्रमाणपत्रासह तसेच, सर्व प्रकल्पांच्या संदर्भात महालेखाकारांचे अहवालात/लोक लेखा समितीच्या अहवालात/स्थानिक लेखा परिक्षणात कोणतेही

आक्षेप प्रलंबीत नाही/घेतलेला नाही याबाबत सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांचे प्रमाणपत्रासह, उर्वरित निधी उपलब्ध करुन देण्याबाबतचा प्रस्ताव सादर करावा.

xi) शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या सूचनेप्रमाणे संचालक (वित्त) महाराष्ट्र जीवन प्राधिकरण मुंबई यांनी या अनुदानाच्या खर्चाचा महालेखापाल कार्यालयात नोंदविलेल्या खर्चाशी ताळमेळ घालावा व ताळमेळाचे अहवाल विहित कालावधीत सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांच्या मान्यतेने या विभागातील पापु-०४, पापु-१६ व पापु-२० या कार्यासनांस सादर करावा.

xii) सदर रक्कम खर्च करताना वित्त विभागाचा शासन निर्णय क्रमांक अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ ३, दिनांक १४ ऑक्टोबर २०२१ व दिनांक ०३ फेब्रुवारी, २०२२ मधील अटी व शर्तींचे काटेकोरपणे पालन करून, आवश्यक त्या बाबींची पूर्तता करून कार्यपूर्ती अहवाल/नमूद प्रमाणपत्रे शासनास त्वरित सादर करावीत.

२. सदर योजनेसाठी उपरोक्तनुसार रु.९५०.०० लक्ष (रु.नऊ कोटी पन्नास लक्ष फक्त) इतका निधी आहरीत करण्यासाठी (श्री. राजेंद्र मडके ) संचालक (वित्त), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण बेलापूर, नवी मुंबई यांच्या स्वाक्षरीने तयार केलेले व (श्री. अभय महाजन) सह सचिव,पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय यांनी प्रतिस्वाक्षरीत केलेले देयक अधिदान व लेखाधिकारी कार्यालय, मुंबई येथे सादर करण्यात यावे. सदर योजनेसाठी रु.९५०.०० लक्ष (रु.नऊ कोटी पन्नास लक्ष फक्त) इतका निधी कोषागारातून आहरीत करण्यासाठी संचालक (वित्त) (श्री. राजेंद्र मडके ), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण बेलापूर, नवी मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच (श्री. अभय महाजन), सह सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर सहायक अनुदान हे सशर्त मंजूर करण्यात येत आहे.

४. हा खर्च मागणी क्र. वाय-०२, २२१५ पाणी पुरवठा व स्वच्छता, ०२ जलनिस्सारण व स्वच्छता, १०७ मलप्रणाल सेवा (०२), ग्रामसफाई कार्यक्रमांतर्गत अर्थसहाय्य (राज्य पुरस्कृत योजना) (०२) (११) ग्रामीण

भागातील सांडपाणी व्यवस्थापनाकरिता नाबार्ड कर्ज (योजनांतर्गत) (२२१५ ९८७१) ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशिर्षाखाली घालावा.

०५. सदर शासन निर्णय वित्त विभागाचा शासन निर्णय क्रमांक अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ ३, दिनांक १४ ऑक्टोबर २०२१ व ३ फेब्रुवारी, २०२२ अन्वये या विभागास प्रदान केलेल्या अधिकारात तसेच शासन निर्णयातील अटी व शर्तींच्या अधीन राहून निर्गमित करण्यात येत आहे. शासन निर्णय क्रमांक अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ ३, दिनांक १४ ऑक्टोबर २०२१ व दिनांक ०३ फेब्रुवारी, २०२२ मधील अटी व शर्तीची तसेच दिनांक १४ ऑक्टोबर २०२१ च्या शासन निर्णयासोबतच्या परिशिष्टातील अ.क्र.९ मधील तपासणीसुचीतील अ.क्र.१ ते १० मधील लागू असलेल्या अटी व शर्तीची पुर्तता होत असल्याचे प्रमाणीत करण्यात येत आहे. नियोजन विभाग व वित्त विभाग यांच्या अनौपचारिक संदर्भ अनुक्रमे क्र.४४/१४४३,दिनांक १८.०२.२०२२ व क्र.६५/व्यय, दिनांक ०९.०३.२०२२ अन्वये दिलेले निर्देशांच्या अधीन राहून सदर निधी मुक्त करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०३२५१५१४४६०४२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

CHANDRAKANT KRISHNA MORE

Digitally signed by CHANDRAKANT KRISHNA MORE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER SUPPLY AND SANITATION DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=11ac200219edb36f7777ee1101657bea4271090267228122b638d6f2cdedad62, pseudonym=268C7E15F99BF8B492638E14751A661EBCF0233F, serialNumber=2314CF333E070F9936792BC95890FA89B2F617A931B2B577B703FA858F3DF433, cn=CHANDRAKANT KRISHNA MORE
Date: 2022.03.25 16:23:06 +05'30'

**(चं.कृ.मोरे)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता, मंत्रालय, मुंबई यांचे खाजगी सचिव.
२. मा.राज्यमंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता, मंत्रालय, मुंबई यांचे खाजगी सचिव.
३. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.

४. प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. संचालक लेखा व कोषागरे, मुंबई.
६. अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई.
७. सह सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
९. विभागीय आयुक्त, महसूल विभाग, सर्व.
१०.मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सर्व.
११.प्रकल्प संचालक (स्वभामि), बेलापूर, नवी मुंबई.
१२.संचालक (वित्त), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, सिडको भवन, नवी मुंबई.
१३.प्रबंधक, नाबार्ड, पुणे.
१४.वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५.नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६.कार्यासन क्र.पापु-०४, पापु-०८ व पापु-२०, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.
१७.निवड नस्ती, कार्यासन पापु-१६.